"नमो शेतकरी महासन्मान निधी" ही योजना
राबविण्यास मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : किसनि-२०२३/प्र.क्र.४२/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक - १५ जुन, २०२३

वाचा :-

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.किसयो- २०१९/ प्र.क्र.२०/भाग-४/११-अे, दि. १५.०२.२०१९
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.किसनि- २०२३/ प्र.क्र.४२/११-अे, दि.१५.०६.२०२३

प्रस्तावना :-

शेतक-यांना निश्चित उत्पन्न मिळण्याकरिता केंद्र शासनाने प्रधानमंत्री कृषी सन्मान निधी (PM-KISAN) योजना सुरु केली असुन सदर योजना केंद्र शासनाने विहित केलेल्या निकषांनुसार आणि यासंदर्भात वेळोवेळी केंद्र शासनाकडून प्राप्त होणा-या निर्देशाप्रमाणे संदर्भ क्र.(१) च्या शासन निर्णयान्वये राज्यात राबविण्यात येत असुन संदर्भ क्र.(२) च्या शासन निर्णयान्वये सदर योजना राबविण्याच्या कार्यपद्धतीत सुधारणा करण्यात आली आहे.

मा. वित्त मंत्री महोदयांचे सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये अन्नदाता बळीराजाच्या उत्पन्नवाढीसाठी प्रधानमंत्री कृषी सन्मान निधी योजनेत राज्य शासनाच्या अनुदानाची भर घालणारी "नमो शेतकरी महासन्मान निधी" ही योजना राबविण्याबाबतची घोषणा केलेली आहे. केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री कृषी सन्मान निधी (PM-KISAN) योजनेच्या धर्तीवर "नमो शेतकरी महासन्मान निधी" ही योजना राज्यात राबविण्याबाबतचा प्रस्तावास दि.३०.०५.२०२३ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यास अनुलक्षून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णयः-

सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये घोषित केल्याप्रमाणे अन्नदाता बळीराजाच्या उत्पन्नवाढीसाठी प्रधानमंत्री कृषी सन्मान निधी योजनेत राज्य शासनाच्या अनुदानाची भर घालणारी "नमो शेतकरी महासन्मान निधी" ही योजना सन २०२३-२४ पासुन खालीलप्रमाणे राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**१. सदर योजनेकरीता लाभार्थी पात्रता व देय लाभासाठीचे निकष खालीलप्रमाणे राहतील :-**

i. सदर योजनेकरीता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना प्रमाण म्हणून गृहित धरण्यात याव्यात.
ii. प्रधानमंत्री किसान सन्मान निधी योजने अंतर्गत पी.एम.किसान पोर्टलवर नोंदणी केलेले व केंद्र

शासनाच्या निकषानुसार लाभास पात्र ठरलेले सर्व लाभार्थी नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेच्या लाभासाठी पात्र राहतील. तसेच केंद्र शासनाने लाभार्थी पात्रतेबाबत वेळोवेळी निकषांमध्ये केलेले बदल तात्काळ परिणामाने नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेच्या लाभार्थ्यांना देखील लागू होतील. या बदलांकरीता महाराष्ट्र शासनाकडून वेगळा शासन निर्णय निर्गमित करण्याची आवश्यकता राहणार नाही.

iii. पी.एम.किसान पोर्टलवर नव्याने नोंदणी होऊन लाभ मिळालेले पात्र लाभार्थी देखील या योजनेचे लाभार्थी राहतील.

**२. योजनेची कार्यपद्धती:-**

पी.एम.किसान योजनेच्या पीएफएमएस प्रणालीनुसार प्रत्येक हप्ता वितरणावेळी लाभास पात्र ठरलेले लाभार्थी नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेच्या लाभासाठी पात्र राहतील. सदर लाभार्थ्यांना राज्य शासनामार्फत विकसित करण्यात येणा-या पोर्टलवरुन/प्रणालीवरुन बँक खात्यात थेट लाभ हस्तांतरणाद्वारे निधी जमा केला जाईल.

**३. नमो शेतकरी महासन्मान निधी योजना पोर्टल/प्रणाली:-**

i. पी.एम.किसान सन्मान निधी योजनेतील लाभार्थीनाच नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेअंतर्गत राज्याच्या निधीमधून लाभ देण्यात येणार असल्याने राज्यासाठी कृषि विभाग आणि माहिती व तंत्रज्ञान विभाग यांनी संयुक्तपणे योजनेसाठी पोर्टल/प्रणाली विकसित करण्याची कार्यवाही करावी.

ii. केंद्र शासनाच्या संमतीने पी.एम.किसान सन्मान निधी योजना आणि नमो शेतकरी महासन्मान निधी योजना या दोन्ही योजनांच्या पोर्टल/प्रणालीचे एकत्रिकरण (Integration) करण्यात यावे, जेणेकरून अनुदान मिळण्यास पात्र लाभार्थीच्या संख्येत होणारा बदल दोन्ही पोर्टलला एकाच वेळी प्रत्यक्षात येईल.

**४. निधी वितरणाची कार्यपध्दती:-**

"नमो शेतकरी महासन्मान निधी योजना" या योजने अंतर्गत केंद्र शासनाच्या PM-KISAN योजनेनुसार खालील वेळापत्रकाप्रमाणे लाभ पात्र लाभार्थ्यांच्या बँक खात्यावर थेट हस्तांतरणाद्वारे आयुक्त (कृषी) यांच्या मार्फत वितरीत करण्यात येईल.

| अ.क्र. | हप्ता क्रमांक | कालावधी | रक्कम |
|---|---|---|---|
| १ | पहिला हप्ता | माहे एप्रिल ते जुलै | रु. २०००/- |
| २ | दुसरा हप्ता | माहे ऑगस्ट ते नोव्हेंबर | रु. २०००/- |
| ३ | तिसरा हप्ता | माहे डिसेंबर ते मार्च | रु. २०००/- |

**५. योजने अंतर्गत अपात्र लाभार्थ्यास लाभ प्रदान झाल्यास करावयाची वसुली:-**

सदर योजने अंतर्गत अपात्र लाभार्थ्यास लाभ प्रदान करण्यात आल्यास सदर लाभ धारकाकडून करावयाची वसुली महसूल यंत्रणेमार्फत करण्यात येवून आयुक्त(कृषि) यांच्या मार्फत शासनाकडे जमा करण्यात यावी.

**६. प्रकल्प संनियंत्रण कक्ष -:**

(१) राज्यात प्रधानमंत्री किसान सन्मान निधी योजना राबवण्यासाठी शासन निर्णयानुसार प्रकल्प संनियंत्रण कक्षाची स्थापना करण्यात आलेली आहे. सदर प्रकल्प संनियंत्रण कक्षाने नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करावे.

(२) योजनेतील मनुष्यबळाचे संनियंत्रण व इतर आवश्यक कामकाज राज्याच्या प्रकल्प संनियंत्रण कक्षामार्फत करण्यात यावे.

**७. प्रशासकीय खर्च**

नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेच्या प्रशासकीय खर्चासह वित्त विभागाने/शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयांनुसार बाह्यस्थ संस्थेद्वारे घ्यावयाच्या मनुष्यबळासाठी आवश्यकतेनुसार वार्षिक तरतूदीच्या १ टक्के पर्यंत रक्कम खर्च करण्यात यावी.

**८. अंमलबजावणी करण्यासाठी संनियंत्रण समित्या:-**

प्रधानमंत्री किसान सन्मान निधी योजनेंतर्गत ग्रामस्तर, तालुकास्तर, जिल्हास्तर व राज्यस्तरावर स्थापन करण्यात आलेल्या संनियंत्रण समित्यांमार्फत सदर योजनेचे संनियंत्रण करण्यात यावे.

**९. नोडल अधिकारी यांची नियुक्ती:-**

प्रधानमंत्री किसान सन्मान निधी (पी.एम.किसान) योजने अंतर्गत ग्राम स्तर, तालुका स्तर, जिल्हास्तर, विभागस्तर व राज्यस्तर नोडल अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात आलेले अधिकारी यांनी सदर योजनेसाठी नोडल अधिकारी म्हणून कामकाज पहावे.

**१०.** सदर योजनेची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची जबाबदारी आयुक्त(कृषी) यांची राहील. तसेच आयुक्त (कृषि) यांनी योजनेच्या अंमलबजावणीबाबत प्रत्येक ३ महिन्यास आढावा घेऊन त्याबाबचा प्रगती अहवाल शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

**११.** प्रस्तुत योजनेबाबतच्या सविस्तर मार्गदर्शक सुचना आयुक्त (कृषि) यांनी निर्गमित कराव्यात.

**१२.** सदरील शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१२९/२०२३/व्यय-१, दि.२०.०४.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**१३.** प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२३०६१५१७४५५१३१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEETA EKNATH SHINDE

Digitally signed by NEETA EKNATH SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=f2bffd6992498e5666302436 8c72b33364cfb066d53682c53a425e54d187a7c1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F325D659F47933958AA2D98F394DB95F94BE57548776492BA36E77EA1C4AA53B, cn=NEETA EKNATH SHINDE
Date: 2023.06.15 17:46:51 +05'30'

**( निता शिंदे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५. सर्व मा.विधानसभा / मा. विधानपरिषद सदस्य
६. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
७. अप्पर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०.अप्पर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११.अप्पर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुमविभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१२.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१३.महासंचालक, माहिती व ज नसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१४.सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
१५.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.सर्व जिल्हाधिकारी
१७.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१९.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
२०.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा ), मुंबई.
२१.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई
२२.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा ), नागपूर
२३.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
२४.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२५.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२६.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२७.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२८. सर्व तहसिलदार
२९.सर्व तालुका कृषि अधिकारी
३०.निवडनस्ती, कार्यासन ११-अे.